# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय - 21

# दंडी स्वामींचे कुकुटेश्वरास आगमन

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 21, पान161. कथाभाग<br>1.श्रींच्या आज्ञेनुसार शंकर भट्ट आणि धर्मगुप्त मांचालदेवीचे दर्शन घ्यायला निघाले असताना..<br>वाटेत विविध अध्याय विषयावर नवीन माहिती घेत असताना, विचारतात,<br>श्रींनी म्हटले की पीठिकापूर संस्थान बनेल वसिष्ठ वंश पुजारी म्हणून तेथे नियुक्त होईल. वगैरे.? | 3.पीठिकापुरात घडलेल्या गोष्टींचा संदर्भ देऊन गुरुचरण सांगू लागले. ते एकदा जगन्नाथ पुरीला व्यापारासाठी गेले होते. तेथे त्यांना व बरोबरच्या व्यापारी मित्रांना मुख्य देवतेचे दर्शन झाले नंतर श्रींच्या दर्शनाचा लाभ झाला. श्रींची लीला मजेशीर असते. ते आधी संकटात टाकतात आणि मग शरणागत झाल्यावर संकटांचे निराकरणही करतात. याची एक घटना त्यांच्या समोर घडली.<br>4.एक |
| 2. अहो, शंकर भट्ट, हे सर्व काही शतकांनी घडणार आहे. या घटनेची सांगता दिव्य संकल्पा शिवाय शक्यच नाहीत. पवित्र भाव असणाऱ्याकडून पवित्र स्पंदने स्वीकारली जातात. काही प्रदेशातील वायु मंडळात पवित्र भावतरंग प्रबळ, शक्तिसंपन्न झाल्यास नकळत, सहजपणे महापुरुषांचे तिथे आगमन होत असते. त्याच प्रमाणे दुष्ट भावतरंग जेथे | दंडी स्वामी आपल्या १०८ शिष्यांच्या लवाजम्यासह नेमके तिथे आले होते. आदराने गुरुचरणांनी त्यांना आदरपूर्वक नमस्कार केला. नुकतेच श्रींचे दर्शन झाले असल्याने दंडी स्वामींना विचारले, 'आपण श्रीपाद श्रीवल्लभांना ओळखत असाल? कुठल्या तरी क्षुद्र मांत्रिकाला आम्हीले ओळखत नाही. तुम्ही त्यांचे चेले असेच क्षुद्र असाल.' त्यांचे शिष्य गण म्हणाले, आमचे |

प्रबल होतात तेथे दुष्ट लोक एकत्र येतात. म्हणून शुद्ध स्थळी, वास्तव करावे. शुद्ध भावाने जगावे.

5. आणि खरोखरच ते दंडी स्वामी पीठिकापुरात आले. पण कधी पावले उचलता येईनात. कधी त्यांच्या ब्रह्मदंडाचे तुकडे झाले. कुक्कुटेश्वर मंदिरातील दत्ताच्या मूर्तीला दहिभाताचा नैवेद्य श्रींच्या मुखात जात आहे असे पाहून दंडी महाशय भानावर आले. पीठिकापुरातील श्रींची निंदा करण्यात धन्यता मानणाऱ्या भिक्षुकी करणाऱ्याचाही अहंकार नष्ट झाला. ' उंटाच्या लग्नात गाढवांचा संगीत जलसा! म्हणतात उंटाने गाढवांची वाहवाही करावी आणि गाढवाने उंटाची प्रशंसा करावी असे झाले! असे म्हणून श्रींनी त्यांना चांगली अद्दलग घडवून गर्व हरण केले...

अध्याय 21 समाप्त.

गुरू तुमच्या पीठापूरला येऊन तेथील ब्राह्मण वृंदासमोर तुमच्या श्रीपादांकडून विजयपत्र लिहून घेतील. तेंव्हा कळेल!

6. अरुंधती वसिष्ठ संबंध, ११६, २३९८ आकड्यांचे महत्त्व यावर परतताना वाटेत भेटलेल्या कृष्ण दास नामक मालदासरी (मंदिरात पुजासामान विक्री करणारे) भाष्य केले. सवितृकाठक चयन यागाचे फल म्हणजे श्रींचा अवतार असा खुलासा केला. त्यांनी त्यांच्या समोर घडलेला किस्सा सांगितला. एकदा त्यांच्या अजोबांचे मित्र नरसिंह वर्मा यांच्या बरोबर शेतात गेले होते तेव्हा त्यांना झोप लागली असताना श्रींनी आसपास वेटोळे घालून बसलेल्या सापांना माना मोडून मारले अन नंतर पुन्हा जोडून जीवंत करून सोडून दिले. असे का केले? यावर ते म्हणाले, 'माणसाच्या कामात अनेकदा अडथळे राहूच्या प्रभावाने येतात. अडथळे कोण आणतात ते कळत नाही. अशा योगाला कालसर्प योग म्हणतात. तो दोष मी नाहीसा केला. असे मला माझ्यावर विश्वास असणाऱ्याकरता करावे लागते'.







।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय - २२

# दंडी गुरुदत्त भट्ट वृतांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 22, पान श्री गुरु चरण, कृष्णकांत, कृष्णदास शंकर भट्ट यांच्या समावेत गुरु दत्ता भट प्रख्यात ज्योतिषी यांच्यामधील चर्चा. | श्रीपादांचे वय 10 |
| 1. शंकर भट्ट का विचारतात, ' काहो! ज्योतिष शास्त्राप्रमाणे वर्तविलेले भविष्य नेहमीच खरे निघते का? मानव जीवन प्रारब्ध नियोजित आहे का की मानवी प्रयत्न वर अवलंबून आहे? तसेच वर्तविलेले भविष्य बदलू शकते का?'<br>यावर श्री भट्ट सांगू लागले, मी माझ्याच बाबतीची घटना सांगतो. मी ज्योतिष शास्त्रातील फार मोठा पंडित आहे असा माझा भ्रम नष्ट झाला! एकदा पिठीकापुरात गेलो असताना पादगयेतील कुक्कुटेश्वर मंदिरात गेलो असताना तिथे बरेच लोक श्रींच्या विषयी निंदा करून चेष्टा करताना भेटले. मला ते खरे वाटत असताना माझी नाडी व हृदय बंद होऊन मृत्यू झाल्याचे<br>2. जाणवले. त्या वेळी श्रींचे दर्शन झाले. तेंव्हा ते १० वर्षाचे होते. मी दत्त आहे की नाही ते नंतर ठरवू. म्हणून मला मृत देहात जीव आणून घरी नेले. दहीभात खाऊ घातला. माझ्या कुंडलीप्रमाणे मला मृत्यूयोग होता. पण मग मी गुरुकृपेने पुन्हा जीवंत झालो. याचा प्रत्यय आला. आता या पार्श्वभूमीवर आपल्या प्रश्नांची उत्तरे मिळतील. | <br>कुकुटेश्वर मंदिर |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

3.'पूर्वजन्मातील प्रारब्ध कर्माच्या गणिताने माणसाचा योग्य ग्रहसंपुटीत जन्म होतो. हे ग्रह मानवावर प्रेमही करीत नाहीत की त्याचा द्वेषही करीत नाहीत. ते अलिप्त (साक्षीभूत) असतात. त्यातून निघणाऱ्या विविध किरणांच्या, स्पंदनामुळे त्या त्या काळाप्रमाणे, देशाप्रमाणे घटना घडवल्या जातात. जीव त्या घटनांचे, परिस्थितीचे घटक बनतात. म्हणून मानवीय जीवन प्रारब्ध नियोजित आहे. मानवी प्रयत्नांची जोड मिळाली तर अरिष्ट घटना टाळण्यासाठी माणसाला त्याचा प्रतिबंध करायला प्रतिघटित स्पंदने, किरणे तयार करायला हवी असतात. ती शक्ती मंत्र, तंत्र, ध्यान, प्रार्थना वगैरे प्रकारांनी किंवा स्वतःच्या योगशक्तीमुळे येऊ शकते. परंतु पूर्व जन्म कर्म प्रबल असेल तर वरील उपाय पण काही करू शकत नाहीत. ग्रहांचे परिणाम भोगावेच लागतात. श्रीपादवल्लभ मात्र हे

4. विधिलिखित बदलून चांगले विधिलिखित लिहू शकतात. साधारण दैनंदिन जीवनात हे शक्य नाही. कारण सृष्टीक्रमात किंवा कर्म देवतांच्या कार्यात श्रीपाद उगाच ढवळाढवळ करीत नाहीत. पण आपल्या भक्तांच्या आवेदना, आर्त हाका त्यांचे हृदय वितळू शकतात. भक्तांच्या श्रींच्या उफाळून येणाऱ्या  करुणेच्या प्रभावामुळे कर्म देवतांच्या शक्ती निर्बल होतात. कर्म जड असते. श्री चैतन्य स्वरूप असल्याने ते पृथ्वीचे आकाश व आकाशाची पृथ्वी करू शकतात. या त्यांच्यासाठी सामान्य गोष्टी आहेत. ज्योतिष शास्त्राप्रमाणे हजार वर्षानंतर घडणाऱ्या घटना ते आत्ताच घडवू शकतात.

5. श्रीपादश्रीवल्लभ आणि त्यांच्या सभोवतालच्या व्यक्तींशी ते कोणत्या भाषेत बोलायचे?

वडील अप्पळराजू, आजोबा बापन्नार्य, ग्रंथी विद्वानांशी ते संस्कृतमधे तर अन्य घरगुती लोकांशी तेलुगूत संभाषण करत. हिमालय परिसरात बोलली जाणारी संध्या भाषा, तसेच जो भेटायला येई त्याच्या भाषेत ते बोलत. जॉन म्हणून जर्मनीहून त्यांना भेटायला आला होता तेंव्हा ते त्यांच्याशी बोलले तेलुगूत व तो बोलत होता जर्मन भाषेत. पण संभाषण एकमेकांना आपापल्या भाषेत समजत होते!

आन्ध्र प्रदेश भागातील ११ शिवक्षेत्रांची माहिती सांगितली जाते. खरे तर शिवाची मूर्ती नाही. द्वादश ज्योतिर्लिंगे बारा राशींचे प्रतीक आहेत. शिवरात्रिच्या दिवशी रात्री १२ ते २ तास मानतात. पीठिकापुरात असले म्हणून त्यांना माझे दर्शन होत नाही... पण जे लोक ज्ञानी,  अधिकारी असतात त्यांना मी किती दूरवर असो तरी  भेट देतो किंवा घेतो.

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

7. आंध्र प्रदेशातील 11 शिवतीर्थे –

1. बृहतशीला नगर- नगरेश्वर
2. श्री शैल्य- मल्लिकार्जून
3. द्राक्षारामम- भीमेश्वर
4.क्षीराराम- रामलिंगेश्वर
5. अमरावती- अमरलिंगेश्वर
6. कोटीपल्ली- कोटीपल्लीश्वर
7.पीठिकापूर- कुकुटेश्वर
8. महानंदी- महानंदीश्वर
9.काळेश्वर- काळेश्वर
10.काळहस्ती- काळहस्तीश्वर
11. त्रिपुरांतक- त्रिपुरांतकेश्वर

विविध मंदिरातील भेटी व घटना पुढील अध्यायात येतात अध्याय 22 समाप्त.




शिवतीर्थे

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय - 23

# शिवपुजा रहस्य विवरण, भक्तिमहिमा

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 23, पान 172. कथानक शंकर भट्ट श्रींच्या दर्शनासाठी कुरवपुरात नदी ओलांडून जाताना धर्म गुप्त म्हणून व्यापारींशी गाठ पडले. त्यांच्या बरोबर बोलताना... | |
| 1.शंकर भट्ट मनात म्हणत होते की आत्तापर्यंत जे लोक भेटले त्यांनी श्री दहा वर्षाचे होईपर्यंतच्या घटनांबद्दल कथनातून जीवनचरित्राचा भाग कळत राहिला. आता श्रींच्या ११व्या वर्षातील काही विशेष घटना समजून घ्यायला कोण मदत करेल का? धर्मगुप्त हे पीठापूरच्या वेंकटपय्या श्रेष्ठींचे नातलग होते व मी तुम्हाला श्रींच्या ११व्या वर्षातील अदभूत आठवणींचा कथाभाग सांगतो म्हटल्यावर श्रींच्या लीलाविहारातून कसे नेमके लोक भेटतात आणि आपले मन मोकळे करतात याचे नवल वाटत राहिले. | 2. धर्मगुप्त हे पीठापूरच्या वेंकटपय्या श्रेष्ठींचे घरी जाताना वाटेत कुक्कुटेश्वर मंदिरात दर्शनासाठी गेले असता तिथे एक शिवयोगी नामक कोणी मळ्यात वेषातआले होते. त्यांच्या बरोबर २ नाग फूत्कार करत फिरताना पाहून पुजाऱ्याची आणि अन्य दर्शनार्थिंची भितीने गाळण उडाली. त्यावेळी सूर्यचंद्र शास्त्री अवधान राखून नमक चमक स्तोत्र आलापींसह चमक सुस्वरात आलाप घेत जोरात म्हणू लागले. |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

त्या वेळी नागांनी डोलून ताल होऊन धरला. नंतर त्यांना मी श्रींच्या दर्शनासाठी पिठीकापुरात आणले. श्रींच्या दर्शनाने ते योगी ३ दिवस ध्यान मग्न होऊन गेले. नंतर श्रींनी त्या वृद्ध योगींना अरे तुरेच्या सलगीतून शिवमहिमा, लिंग स्वरूप, अर्धानारीरूप यावर उलगडून अनमोल मार्गदर्शन करून पाठवले. ह्या सर्वांचा साक्षी होण्याचे भाग्य मला लाभले.

अ 23 समाप्त.



।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

## अध्याय - 24 अर्धनारी विवरण

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 24, पान175. कथानक<br>1. धर्मगुप्त आणि शंकर भट्ट यांच्यातील चर्चा.<br>कुरवपुरात नदीच्या दक्षिण? काठावर वसलेल्या आमच्या वास्तव्याच्या ठिकाणी धर्मगुप्तांसमावेत अधूनमधून शिव तत्वाविषयी चर्चा घडत असताना... | 2. शंकर भट्ट धर्मगुप्तांना म्हणाले, 'आर्द्रा नक्षत्र आणि शिवपार्वती यांचा कसा संबंध आहे?' यावर ते म्हणाले, 'आर्द्रा नक्षत्राच्या काळात हरणाची शिकार करणाऱ्या शिव रुद्ररूपी व्याधाच्या धनुष्यबाणाचे ताऱ्यांचे दर्शन रात्रीच्या अवकाशात होते. |
| 3. ते मिथुन आणि कर्क राशिच्या मधे आडवे दिसते. या नक्षत्राच्या मंडलाजवळ नि, राहू आदि क्रूरग्रह संचार करत असताना त्यांच्या ग्रहगतीमुळे जगात युद्ध, प्रलय, होतात. महाभारतातील वर्णन केलेल्या युद्धात असेच ग्रहमान होते. या कालसंहार मूर्तीचे म्हणजे धनुर्धारी उग्रमूर्ती रुद्राचे आयुध धनुष्य बाण असते'. 'माघ महिन्याच्या अमावस्येच्या आधी येणाऱ्या चतुर्दशीला 'महाशिवरात्रि' तर अन्य महिन्यातील चतुर्दशीला 'शिवरात्रि' म्हणतात.' | 4. मृग नक्षत्र- उजव्याबाजूचे तीन तारे शीर्ष चार तारे पाय किंवा खूर आणि सरळ रेषेतील तीन तारे व्याधाचा बाण असे मानतात.<br><br> |
| 5. नाग शंकरांचे आभूषण आहे. कुंडलिनी शक्ती सर्पाकार असते म्हणून शिवाला 'नागा भरण' असे म्हटले जाते. ईश्वर ज्याने अष्ट महासिद्धींवर ताबा मिळवला | 6. ' ज्ञान चार टप्प्यांमध्ये होत असते म्हणून शिवभक्त कपाळावर विभूतीचे ४ पट्टे ओढतात.' |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

आहे, त् यांना वश करून त्यांचा ते लोककल्याणाकरिता उपयोग करतात म्हणूनही शिवाला 'ईश्वर' म्हटले आहे. 'डमरू' हा शब्दगुण आकाशाचा त्यामुळे स्पंदने निर्माण होतात. योग्यांना आनंद होतो. हे शिवाचे स्थान 'स्मशान'. योगाग्नीने भौतिक इच्छा भस्मीकृत झाल्या म्हणून ती पांढऱ्या रंगाची 'विभूती' होय.माणसाची आलोचना नष्ट झाल्या की त्याला शुद्ध ज्ञानाची प्राप्ती होते. याचे एक सूचक म्हणून कपाळावर विभूतीचे 'चार पट्टे' ओढतात.

'शंकर भट्टनी धर्म गुप्तांना शिवांच्या अनेक अलंकारांच्या विषयी आणि अभिनय विधान विषयी माहिती विचारली आणि त्यातील गूढार्थ सांगण्याची विनंती केली शंकराचे त्रिशूळ हे मुख्य आहे. ती तीन टोके सत्व रज आणि तम या गुणांचे सूचक आहेत. इडा,पिंगला नाडीतूनश्वास प्रवाह भ्रूमध्यातील शिरस्थानी पोचतो. इडा, पिंगला, सुषुम्ना या तीन नाडीच्या ब्रह्मज्ञान केंद्राला त्रिवेणी संगमस्थान असे म्हणतात . हाही त्रिशूळाच्या गूढार्थ आहे.

7. नाग शंकरांचे आभूषण आहे.

कुंडलिनी शक्ती सर्पाकार असते म्हणून शिवाला 'नागा भरण'असे म्हटले जाते.ईश्वर ज्याने अष्ट महासिद्धींवर ताबा मिळवला आहे, त्यांना वश करून त्यांचा ते लोककल्याणाकरिता उपयोग करतात म्हणूनहीशिवाला 'ईश्वर' म्हटले आहे. 'डमरू' हा आकाशाचा त्यामुळे स्पंदनेनिर्माण होतात.

8. योग्यांना आनंद होतो. हे शिवाचे स्थान 'स्मशान'. योगाग्नीने भौतिक इच्छा भस्मीकृत झाल्या म्हणून ती पांढऱ्या रंगाची 'विभूती' होय. माणसाची आलोचना नष्ट झाल्या की त्याला शुद्ध ज्ञानाची प्राप्ती होते. याचे एक सूचक म्हणून कपाळावर विभूतीचे 'चार पट्टे' ओढतात.

9. ज्ञानाची परिशुद्धता दर्शक 'शिलाजीत' नावाचे चिकट औषध दिव्य औषध आहे. अर्धनारीश्वर तत्त्वाचा गूढशक्ती दोन प्रकारे विभाजित असते.रात्री शिवाय दिवस नाही. नि दिवसांशिवाय रात्र नाही. एकमेकांना ते आधारभूत असतात. म्हणूनच या चराचराच्या सृष्टीचे संचलन करीत असतात शिवाला संहारक म्हणण्याचा गूढार्थ जुने सृष्टी जाऊन नवीन सृष्टी काही काळ राहून पुन्हा नाश करणे अनिवार्य आहे.

१०. गृह संचार व याचा प्रभाव कसा असतो? शनिप्रदोष ईश्वरआराधना करून शनि दोष निवारण कसे होते?
पंचभूतात्मक हे काय आहे? पडद्यामागचे लपवलेले 'चिदंबरम रहस्य' म्हणजे पडदा बाजूला केला तर आज काहीच नसते हे परमेश्वर निराकार आहे. याचे प्रतीक आहे. असा जो शिव तो मी एका महासिद्ध मानवीरूपात आज पीठिकापूरात श्रीपाद श्रीवल्लभ रुपात अवतरला आहे. असे धर्मगुप्त म्हणाले.

११. शंकर भट्टाने गोंधळुन विचारले,'श्रीपाद हे पद्मावती समावेत 'वेंकटेश्वर' स्वामीचे म्हणजे विष्णुचे स्वरूप आहे असे म्हणता. शिवाराधना करा म्हणून ही सांगता म्हणून आता मला खुप गोंधळल्यासारखे वाटते.

धर्मगुप्त म्हणाले, 'स्पष्ट सांगायचे तर सर्व प्रकारच्या लीला श्रीपादांच्या रूपाने संचार करीतला दाखवणारे लीला नाट्य की सूत्रधार हेच स्वामीच आहेत आज आहेत. वाम म्हणजे डावी'शक्ती' संचाराचा उजवा भाग 'शिव' संचाराचा हे म्हणून ते 'शिवशक्ती' रूप आहेत.

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय - 25 रुद्राक्ष महात्म्य

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 25, पान 180. कथानक<br>श्री धर्मगुप्त आणि शंकर भट्ट चर्चा चाललेली आहे. शिव आराधना पद्धत व त्याचे फळ<br>1.अहो धर्मगुप्त, शिव आराधना कुठल्या प्रकारे करावी हे सांगून माझ्यावर कृपा करा.<br>धर्मगुप्त म्हणाले, 'अहो शंकर भट्ट, शिव आराधना पंचाक्षरमंत्राने करावी. महान्यास विधीने शिवाराधना करणे ही दुसरी पद्धत आणि रुद्राभिषेक ही तिसरी पद्धत. | यावर अधिक माहिती देताना वसिष्ठ व अगस्ती मुनींचा जन्म, ईश्वर विविध रूपदर्शन श्रीपाद अर्चनाने, स्पर्शाने 33 कोटी रुद्र गणांचा अनुग्रह लाभ, रुद्राक्ष वर्णन आदि कथन चालू<br>2.असताना, अचानक श्रीवल्लभ श्रीपाद तिथेत येऊन विचारायला लागले की "श्रीपाद नावाचा नावाचा कुणीतरी आहे म्हणे? तो शिवरूप आहे म्हणे मी श्रीपाद?" धर्मगुप्त त्यांना 'हो' असे म्हणून श्रीपादांना धर्म गुप्त म्हणाले, 'मी तर एक सामान्य माणूस! माझे ज्ञान ते किती? विवरण करणारा मी कोण? त्यामुळे आपल्या प्रश्नाला 'मौन' हेच उत्तर राहील'! |
| 3. ते ऐकून श्रीपाद प्रसन्न झाले. त्यांनी आणि धर्म गुप्तांना त्यांच्या पदस्पर्शाने नमस्कार करण्याची अनुमती दिली. आम्ही त्यांच्या चरणांना स्पर्श करतात आमची बाह्य स्मृती हरपली आणि आम्ही बराच वेळ ध्यानावस्थेत राहिलो. श्रीपादांनी आम्हाला कुरवपुरहून कृष्णा नदी ओलांडून पैलतीराला 4. जायला सांगितले. त्या रात्री श्रीपादांच्या दिव्य लीला प्रसंगांच्या आठवणीत आम्ही रंगून गेलो .<br>अध्याय 25 समाप्त.. | <br><br><br>रुद्राक्षाचे झाड पंच मुखी रुद्राक्ष |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय - 26 कलियुगाची लक्षणे

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 26, पान 183. कथानक श्री, धर्मगुप्त आणि शंकर भट्ट यामधील कुरवपुरामध्ये घडलेली चर्चा. म्लेंच्छ जातीची उत्पत्ती 1.धर्मगुप्तांनी श्रीपादानांच्या प्रार्दुभाव विषयी म्हणून तर सांगण्याची विनंती केली. तेव्हा श्रीपाद म्हणाले, 'परमात्म्याचे विराट स्वरूप आहे. मागच्या कर्माचे फळ क्रम पद्धतीने पोहोचवण्यास करिता काळ आवश्यक आहे. पितृ देवता म्हणजे मेलेले मोठे लोक नाहीत. नंतर कलियुगातील लक्षणे सांगून म्लेंछ जातीची उत्पत्ती कशी झाली ते सांगून श्रीपाद म्हणाले, 'म्लेंछ जातीचा मूळपुरुष आदम व हव्यवतीही स्त्री होती. त्यांच्या विहारार्थ उद्यान वाटिकानिर्मिती केली होती. ते बहीण भाऊ होते. | 2. कन्यका परमेश्वरी माझी सहोदरी आहे. तिच्या जुळ्या भावाच्या रूपात जन्मणारा विरूपाक्ष नंदीश्वराच्या अंशामुळे जन्मला. आमच्या विवाहसमयी माझ्या भावाच्या रूपात हजर राहून धन्य होशील. बृहतशीला नगर राजधानी ज्याच्या पश्चिम भागात गोस्तनी नदीच्या सीमेवर आहे तिला जेष्ठशैल असेही म्हणतात. या 18 शहरांच्या नगरीत श्री वासवी कन्यकेचा वाढदिवस उद्या शुक्रवारचा दिवस महापवित्र काळ. तुम्हाला उद्या तिचे चरित्र नक्की ऐकवीन. पंच पहाडाच्या दरबारात येणारे सर्व भक्त धन्य होतील. दर गुरुवारी धर्म बोध करेन. दत्तात्रेयाला स्मरण करणाऱ्यांना दत्त रक्षण सदैव लाभते. |
| कलीने तेथे प्रवेश केला व त्यांच्यात कामभावना जागृत केली अशाप्रकारे पतित होताच त्यांच्यातील दिव्य शक्ती नाहीशी झाली. द्वापार युगाच्या म्हणजेच 28शे संवत्सरात अंत होत असताना म्लेच्छ देशात ही संतती वाढू लागली. ती आर्यधर्म दूषित करणारी भक्षक वामाचारी होती. मी कल्की | 16.5 शेराचे आरती पात्र आणि एक घंटा असे पीठापूरच्या संस्थानात 6 पुरुष खोल पोहोचेल, तेंव्हा माझे चरित्र प्रकाशित होईल. यावरील माहितीचा फोटो असेल तर हवा आहे. अध्याय 26 समाप्त. |

अवतार धारण करून अधर्मियांचा नाश करून सत्ययुग स्थापन करणार आहे'. असे श्रीपादांनी सांगितले. येत्या शतकात भारत म्लेंच्छांच्या जातीच्या स्वाधीन होणार आहे. विधि विधान चित्रविचित्र आहे.

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 27

# पंचदेवपहाड प्रांतात विरूपाक्ष दर्शन

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 27, पान 187. कथानक<br>1.श्री धर्मगुप्त आणि श्री शंकर भट्ट ज्या पैलतीरावर गुरुवारी दुपारी चर्चा करत असताना...<br>श्रीपादांनी आम्हाला पंचदेव पहाड प्रांतात गवताचे घर एका दिवसात बांधायला सांगितले. तो प्रांत आम्हाला परिचित नव्हता. गृहनिर्माणाची जागा, लाकूडफाटा अशा कार्याला लागणारे गवत वगैरे हे सगळं करणारे चांगले कारागीर पण हवे होते. दिशा माहीत नसलेल्या वाटसरू प्रमाणे आम्ही दोघे शोध घेऊ लागलो. | 2. पंचदेव पहाड स्थान विशेष<br>एका शेतात पोचलो तेंव्हा त्याचा मालक आदरपूर्वक भोजनाला बोलावून मला देऊन म्हणाला, ‘काहो, आमची गुरे चोरून दुसऱ्या प्रांतात विकून पुन्हा इथे गुरे शोधत आला का? त्याशिवाय वर तुमच्या मनात मी क्षूद्र जातीचा म्हणून शंका येते आहे, होय ना?<br>तो आम्हाला चोर समजत आहे . हे आमच्या लक्षात आले. शिवाय समजले की त्याचे नाव विरूपाक्ष आहे. जेवणानंतर आम्हाला दोघांना त्यांनी झाडाला बांधून ठेवले आणि आपल्या सेवकांच्या मार्फत धर्मगुप्ताचे सर्व धन काढून घेण्याचा आदेश दिला. |
| श्रीपादांची कल्पनातीत दिव्य लीला<br>3. आम्ही कितीही सांगितले तरी त्याचा काही उपयोग आम्ही बंदिवान होतो. इतक्यात तिथे 'मैलार' जातीचे लोक आले. त्यांच्या जातीच्या लोकांची 'गंगा कावीळ' नावाची एक पोटजात आहे. वासवी कन्यका परमेश्वरीचे ते साधक होते. ते त्रिपुंड्र धारी हाताने घंटा वाजवीत असे मुखाने स्तुती | मैलार (माला जंगम?) |

स्तोत्र म्हणत, कावडीतून पाण्याचे घडे भरून शुभकार्याच्या वेळी येतात असे आम्हा कळले. त्याप्रमाणे ते तिथे आले असावेत. कारण कुमारी वासवी मातेच्या जयंतीचा तो दिवस होता! 'वीरमुष्ठ' जातीचे लोकही आले. त्यांच्या मागच्या भागावर लाकडी प्रभावळीत लढाईची, शस्त्रांची चित्रे होती. विष्णुवर्धन राज्याचे ते सैनिक होते म्हणे.
बालानगरू जातीच्या सेनेशी त्यांनी लढून जिंकल्याने वैश्य लोक त्यांना मानाने लग्नसमारंभात बोलवत असत. तसा त्या विरूपाक्ष नामक शेतकऱ्याने वीर मूष्टी लोकांना भोजन देऊन सत्कार केला.

4. आम्हाला मुक्त केले आणि आम्हाला विचारले, 'वीर मुष्टी म्हणजे काय'? आम्हाला त्याचे उत्तर देता आले नाही! मग यांनी झटपट गवताची झोपडी बनवली! ती लीला पाहून श्रीपादांचे नामस्मरण करत ती रात्र आणि तिथेच घालवली. मात्र सकाळी तिथे गवताची झोपडी होती पण गुरेढोरे वगैरे काहीच नव्हते! आम्ही विनोद करणारे वाटून वेडे ठरलो.ती जागा पाहू लोक विचारू लागले, 'किती रुपयांना विकत घेतली?' आम्हाला खरे काय नी खोटे काय काहीही समजत नव्हते!

इतक्यात एक आगंतुक आला, 'आज दशमी, शुक्रवार आहे' हे उत्तर आमच्याकडून न मिळाल्याने आमची पुन्हा फजिती झाली. तुम्ही कुरुगड्डीच्या त्या बिनकामी हिंडणाऱ्या 'वेड्या' कडे चालत आला आहे काय? अशी त्यानी चेष्टा केली. त्यांचे ते

5. आम्ही बुट्टी नावेत बसलो खरे



परंतु आमच्याकडे पैसे नव्हते. तेव्हा नावाडी म्हणाला,' काहो, तुमच्याकडे पैसे आहेत की नाही हे तुम्ही मला आधी सांगायला हवे होते'!. इतक्यात नावाड्याची नजर धर्मगुप्तांच्या हाताकडे गेली. त्यांच्या बोटातील अंगठी काढून घेतली आणि नदीत फेकून दिली! आम्ही कुरवपुरला पोचलो. आम्हाला पाहून श्रीपाद श्रीवल्लभ, 'काय निर्माण केलेत का गवताचे घर का'? आम्ही नाही म्हणून आदल्या दिवशीची घटनांची मालिका सांगितली. 'आले बाळांनो, माझ्या संकल्पाविना कुणीही सोबत देऊ शकत नाही. माझ्यावर कुणाचीही भक्ती जडत नाही. श्रीमंताला क्षणभरात दरिद्री आणि दारिद्र्याला

| | |
|---|---|
| बोलणे, वर्तन आम्हाला आवडले नाही. तरीही धर्मगुप्त म्हणाले, 'त्याच्या बोलण्यात आपल्याला काही कर्तव्यबोध केला आहे. लगेच कुरवपूरला जाऊ या'. | श्रीमंत करू शकतो. वेड्याला स्वस्थ आणि स्वस्थ व्यक्तीला क्षणात वेडा बनवू शकतो. |
| 6.काल तुम्हाला दिसेल शेतकरी माझा भाऊ विरूपाक्ष होता. तुम्ही पाहिलेली गोसंपत्ती कुसुम श्रेष्ठींच्या घरचीच होती. माझी चेष्टा करणारा एक जण, तो नावाडी पण मीच होतो. विविध जाती जमातीचे जन मीच होतो. सर्व विश्व माझ्या स्वाधीन आहे, हे जाणणारे भक्त धन्य होत' असे ते म्हणाले. | 7.<br>अध्याय 27 समाप्त. |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# अध्याय 28

# श्री वासवी नगर वृतांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 28, पान 289. कथाभाग 1.कन्यकादेवीच्या जयंती उत्सवाचा तो शुक्रवारचा दिवस होता. वेंकटेश्वर आणि अलिमेलू मगांबिका यांच्या अर्चनेची वेळ होती. आदल्या दिवशी गोशाळेची निर्मिती झाली होती. श्रीं कृष्णा नदीच्या पात्रात जालावरून चालत पैलतीराला पोहोचले. श्री धर्मगुप्त आणि शंकर भट्ट नावेने तिथे पोचले. श्रीपाद ध्यानस्थ झाले त्यावेळी घडलेली घटना. | 2. श्रीपाद ध्यानमग्न असताना आम्हाला अद्भूत तेज दिसले. त्यांच्या शरीरातून झळाळते तेज बाहेर पडू लागले. बघता बघता त्यांचे शरीर प्राकृतिक वाटत नव्हते. त्यांनी सूर्य भगवानाकडे तीक्ष्ण दृष्टीने पाहिले. रूपाने श्रीपाद सूर्यात विलीन झाले. आम्ही प्रत्यक्ष आमच्या डोळ्यांनी बघितले की आता फक्त ते अदृश्य झाले काही काळानंतर सूर्य बिंबातून एक तेजोमय शिशूचे दर्शन झाले. त्या बालिकेने पाऊल ठेवताच समोरची जमीन अदृश्य झाली. बघतो तर काय श्रीपाद येथे मंद हास्य करीत उभे होते. श्रीपाद सोळा वर्षांचे दिसत होते व ती बालिका तीन वर्षाची दिसत होती. ती श्रीपादांसारखीच रेशमी वस्त्रात होती. |
| 3. आमचा मनात, 'हे सत्य की जादू, इंद्रजाल तर नव्हे'? असे विचार जाणून श्री म्हणाले, 'शंकर भट्ट ही माझी दिव्य प्रकृती आहे. मी ब्रम्हरूप म्हणजे मी ब्रह्माला सृष्टी निर्माण करण्याची प्रेरणा देतो. निर्माण झालेले सर्व जीवसृष्टी काही काळ तसेच राहू देतो. ह्या स्थिती काळात सांभाळण्याचे काम सूक्ष्म रूपाने विष्णूला तशी प्रेरणा देणारा महाविष्णू मीच. सरस्वती वेगळी. महासरस्वती सृष्टी | 4. श्रीपाद म्हणाले,' बाळांनो माझ्यातील वेंकटेश्वर प्रभू तत्व प्रगट झाल्यानंतर त्या प्रमाणे लोकांच्या आणि लोकव्यवहार मर्यादा पाळाव्या लागतात. माझी दिव्य सहोदरी महाशक्ती कृष्णावतार समयी योगमाया रूप धारण करून अंतरिक्षात गेली होती. तिला तपस्येने वासवी रूपात प्रगट केले.' <br>'बेटा शंकर भट्टा, चरित्रामृत जसेच्या तसे लिही. ते भविष्यातील पुढच्या पिढीचा लोकांना |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

संबंधात सरस्वती ज्ञानस्वरूप आहे महासरस्वती त्यास सरस्वतीला शक्ती व प्रेरणा देणारे हे स्वरूप आहे. सृष्टीतील महालक्ष्मी ही त्या लक्ष्मीला प्रेरणा व शक्ती देणारे अनघा स्वरूप आहे. सृष्टीचे शक्तिरूप म्हणजे काली रूप महाकाली शक्ती व प्रेरणा देणारे अनघा स्वरूप मीच आहे'. यावर शंकर भट्ट म्हणाले, 'तुमचा जयजयकार असो तुम्ही स्वतला कधी पद्मावती वेंकटेश म्हणवता, महालक्ष्मी समावेत अनघस्वामी म्हणवता, तुमच्या या तत्त्वाचा लवलेश ही कळत नाही! माझ्यावर प्रसन्न होऊन याचा उलगडा करा '.

स्फूर्तिदायक होईल. अनेक संशय मिटतील. नवीन शक्ती, भक्ती व उत्साह अस्तिकातच नव्हे नास्तिकांतही जागृत होईल. त्याचवेळी मोठा कडकडाट होऊन वासवी कन्येचे अवतरण झाले की काय अशी भीती वाटली! वासवी देवी आणि नगरेश्वराचा अविर्भाव होता. नंतर वैश्य मुनी अवतरले. तोवर जोडप्यांच्या रूपात वैश्य दंपती अवतरले. ते वासवी कन्येचे निवासस्थान असलेले बृहतशीला नगरात राजवाडा बघत असल्याचे जाणवले.

5. तितक्यात श्री कुसुम श्रेष्ठी म्हणाले, 'अहो महागुरू भास्कराचार्य का आले नाहीत? भास्कराचार्य व १०२ गोत्रांचे लाभाद आले का? महर्षी जे होते ते सध्या माझ्या श्रीपादश्रीवल्लभ अवताराचे आजोबा म्हणून पीठिकापूर आत आहेत. ते योग दृष्टीने येथील लीला पाहात आहेत. दिव्य तेज रूपात सूक्ष्म शरीराने अखंड लक्ष्मी सौभाग्यवती सुमती महाराणी, अप्पलराज, वेंकटसुब्बम्मा, वेंकटपय्या श्रेष्ठी उतरून आले. त्यांचा साधक सत्कार झाला. वासवी कन्यकेचा वाढदिवस होता....

6. प्रभात महर्षींच्या कुळात जन्मलेल्या नगरेश्वराचा विवाह संपन्न करण्याचे ठरून साक्षी गंध महोत्सव संपन्न झाला. रात्री मेजवानीची व्यवस्था झाली. नृत्य गान, अप्सरांसह वातावरण उल्हसित झाले. श्रीपाद रूप श्रीनिवास प्रभू म्हणाले, ‘सहोदरी, मी श्रीपाद श्रीवल्लभ रूपात आहे. माझी बहिण म्हणून तू या संस्थानात राहावेस’.

‘हो, भाऊ मला हे मान्य आहे. त्या आधी तू वेंकटेश्वर रूपात बृहतशीला नगरीतील कन्यका परमेश्वरी महासंस्थान परिसरात यावे.' अशी अट बहिणीने घातली.

7. कपट नाट्यसूत्रधारी मंडळाचे ते अद्भूत दृश्य विरत गेले. अशा तऱ्हेने दिव्य वैभवाने श्री वासवी जयंती साजरी झाली....
दुसऱ्या दिवशी गोशाळा हे स्थान पुन्हा साधारण केली जाऊन सकाळी तो सर्व सोहळा आटपून पुन्हा कुरवपुराकडे प्रवास

अध्याय 28 समाप्त...

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 29 श्रीपादांचा दिव्योपदेश

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा ।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये ।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा ।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
| --- | --- |
| अध्याय 29, पान 194. कथानक<br>कुरवपुर आत ते शंकर भट्ट श्रीपादांच्या दर्शनासाठी आलेले असताना त्यांनी जवळ असलेल्या सर्व शिष्यांना बसायला सांगितले...<br>2. **अनन्य शरण आलेल्यांची रक्षा**<br>श्रीपाद म्हणाले, 'बाळांनो, काल झालेल्या श्रीवासवी जयंती उत्सव प्रत्यक्ष पाहणारे तुम्ही खरोखरच धन्य आहात. तुमच्या चैतन्य पातळीप्रमाणे मी तुम्हाला अवगत होत असतो. | सर्वधर्म परित्याग करून तुम्ही अंतक्करणपूर्वक कोण मला शरण आलात तर तुमचा सर्व भार मी स्वतःपाहून तुम्हाला पैलतीरी पोचवतो. या कलियुगात मी नरसिंह अवतार धारण करणार आहे. म्हणून नरसिंह सरस्वती नावाने अवतार धारण करून गाणगापुरात विख्यात होणार आहे.' गोत्र काय? श्रीपाद श्रीवल्लभ प्रसन्न होऊन म्हणाले, ते 102 गोत्रज आर्य वैश्य होणार. आर्या महादेवीश्री वासवी कन्यके सोबत प्रवेश करणाऱ्या दंपतीचे विहार स्मरण पण पापमोचक ठरेल. नंतर श्रींनी गोत्र विवरण केले. |
| 3.शंकर भट्ट विचारतात, ' काल महादेवी वासवीकन्या अग्निकुंडात प्रवेश करणारे ते दम्पतीकोण? त्यांचे<br>'पण हे झाले १०३ गोत्र?' धर्मगुप्त यांनी विचारणा केली. | 'लाभाद गोत्र नष्ट झाले म्हणून १०२ उरले'. अग्निप्रवेश केलेल्या १०२ दंपतींची नावे सांगून आमचे समाधान करून श्रीपाद ध्यानमग्न झाले. आम्हाला ध्यानाला बसा असे सांगितले. अध्याय 29 समाप्त. |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 30

# श्रीपादश्रीवल्लभ महा संस्थान स्थापनावाणी

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय 30,पान 199. कथानक<br>1.रोजच्या प्रवचनातील कथने... श्री, शंकरभट्ट धर्मगुप्त आणि अन्य...<br>**श्रीपाद श्रीवल्लभ महासंस्थान स्थापनेविषयी श्रीपाद वाणी**<br>श्रीपादश्रीवल्लभ ध्यानावस्थेतून बाहेर आल्यावर धर्मगुप्त म्हणाले, 'श्री, १०२ गोत्रजांसमावेत श्रीवासवी अवताराचे अग्नी प्रवेशाचे कारण काय होते? ते श्रीपाद म्हणाले,' बाळांनो, देवी रूपाने महालक्ष्मी अवतरली असताना श्रीरंग नाथांची मधुरभावाने सेवा करून प्रभूंमधे सामावली'. | 2. 'दिव्यात्मा व्हायला माणसाला विशेष पात्रता हवी असते. ही पात्रता त्याच्या शरीरात असलेल्या स्थायी प्रमाणेच त्याच्या शरीरातील परिणाम वेगावर आधारित असतात.<br>प्रत्येक जीव दिव्यात्मा व्हावा हे विश्वमानवाचे अनुल्लंघनीयआहे शासन आहे.... शक्ती विकास करणाऱ्याचा धर्म - कर्मानुसार दैवानुग्रह प्राप्त होतो. वासवी शक्ती देवीचे मन करुणा व प्रेम वाढून जेंव्हा भरून येते तेंव्हा ते अनुग्रह रूपात प्रकट होते. असो... '<br>आधीच्या तू लिहिलेल्या माझ्या चरित्राला आधार काय? ते कसे मान्य करावे? असे विचारणारे महाभाग असणार. माझ्या दिव्य लीलेचा तो भाग आहे. |
| 3. श्रीपादांनी शंकर भट्टांना म्हटले, 'जन्मस्थानी भविष्यात माझे महासंस्थान पीठापूर, श्यामलांबापुर, वायसपूर असे एकत्रित मोठे शहर होणार आहे.<br>पूर्वसुकृताने माझे संस्थान माणिक प्रभूंच्या वंशातील संबंधित व्यक्तीकडून | |

स्थापित होईल. विरुपाक्षाला पुन्हा जन्म घेण्याची आज्ञा केली आहे. तेंव्हा मी त्याला भारताचा चक्रवर्ती करणार आहे... वगैरे... शिष्यांशी चर्चा करून त्या दिवशीच्या प्रवचनाचा समारोप झाला.

अध्याय 30 समाप्त.

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।